**मागणी क्र.व्ही-२ (योजनेतर)**
**प्रधान लेखाशिर्ष "२४२५-सहकार ,**
**३४५१-सचिवालय आर्थिक सेवा"**
**सन २०१६-१७ मधील तरतूदींचे पुनर्विनियोजन.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पुनर्वि-२०१७/प्र.क्र.३७/१७/१७स**
मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय मुंबई- ४०० ०३२
तारीख: ३१ मार्च,२०१७

**शासन निर्णय**

सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभागाच्या नियंत्रणाखाली मागणी क्रमांक व्ही-२ प्रधान लेखाशिर्ष "२४२५-सहकार,३४५१-सचिवालय आर्थिक सेवा" या प्रधान लेखाशिर्षाखाली सन २०१६-१७ मधील (योजनेतर) तरतूदींमधून पुनर्विनियोजन करण्यास मान्यता देण्याचे प्रस्तावित आहे.

सन २०१६-१७ अंतर्गत प्रधान लेखाशिर्ष "२४२५-सहकार,"(योजनेतर) मधील रु.४६.७९ लाख (अक्षरी रुपये सेहचाळीस लाख एकोणऐंशी हजार फक्त) एवढी बचत सोबत जोडलेल्या विवरणपत्र -१ मध्ये दर्शविल्यानुसार प्रधान लेखाशिर्ष "३४५१-सचिवालय आर्थिक सेवा"अंतर्गत सोबत जोडलेल्या विवरणपत्र -२ मध्ये दर्शविल्यानुसार या योजनेसाठी पुनर्विनियोजनाने उपलब्ध करुन देण्यासाठी शासन मान्यता देण्यात येत आहे.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ.संदर्भ क्रमांक-१९१/१७व्यय-२ वअर्थ-१३/२०१७ दि.३१.३.२०१७ व महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका (भाग-१) १९७७ मधील परिच्छेद १६२,१६३,१६४, अन्वये प्रशासकिय विभागांना प्रदान केलेल्या शक्तीनुसार व अपर मुख्य सचिव (सहकार) सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४०११३३७१७८६०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Santosh P. Khorgade

Digitally signed by Santosh P. Khorgade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-operation Marketing And Textiles Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c0546acca372ce2d8edbe5dc7949386daf8955a34dfda38bf6f34ce12b899ea7, cn=Santosh P. Khorgade
Date: 2017.04.01 13:39:54 +05'30'

**(सं.पु.खोरगडे)**
उप सचिव,महाराष्ट्र शासन.

प्रत,मा.अपर मुख्य सचिव (सहकार) सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.

१. सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे
२. महालेखापाल (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता/)-१, मुंबई.

३. महालेखापाल (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता)-२ ,नागपुर
४. अधिदान व लेखाधिकारी,मुंबई.
५. निवासी लेखा अधिकारी,मुंबई
६. अवर सचिव(कार्यासन २स) सहकार,पणन व वस्त्रोद्योग,मुंबई ३२.
७. कक्ष अधिकारी (कार्यासन २स/७स) सहकार,पणन व वस्त्रोद्योग,मुंबई ३२.
८. विभाग(व्यय २/अर्थसंकल्प-१३), मंत्रालय,मुंबई ३२
९. कार्यासन अधिकारी (१६स), सहकार,पणन व वस्त्रोद्योग,मुंबई ३२.
१०. निवडनस्ती का.क्र. (१७स) .

## विवरणपत्र-१

### शासन निर्णय क्रमांक पुनर्वि-२०१७/प्र.क्र.३७/२०१७/१७स/दि.३१.३.२०१७

### मागणी क्रमांक व्ही-२,प्रधान लेखाशिर्ष : २४२५-सहकार, पुनर्विनियोजन प्रस्ताव सन २०१६-१७ (वजा)(-) विवरणपत्र योजनेतर योजना

(रु.लाखा

| अ. क्र | योजनेचे नाव | मुख्य लेखाशिर्ष /उप लेखाशिर्ष | सन २०१६-१७ चे अर्थसंकल्पिय अंदाज किंवा पुरक विनियोजन | | पुनर्विनियोजनाची रक्कम (-) | पुनर्विनियोजना नंतरची होणारी रक्कम | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | | ५ | ६ | ७ |
| १ | परवानाधारक सावकारांकडून शेतक-यांनी घेतलेल्या कर्जाची परतफेड- | २४२५-सहकार,८००- इतर खर्च, (००)(०१) परवानाधारक सावकारांकडून शेतक-यांनी घेतलेल्या कर्जाची परतफेड--(२४२५ २४४४)-३३-अर्थसहाय्य | मं.त. | ०.०० | ४६.७९ | ४७५.८६ | सदर योजनेअंतर्गत आवश्यक असणारी रक्कम खर्ची पडलेली असून उर्वरित रक्कम रु.७२.१५ लाख संभाव्य बचत होणार आहे. |
| | | | पु.मा. | ५२२.६५ | | | |
| | | | एकूण | ५२२.६५ | | | |
| | | एकूण | | ५२२.६५ | ४६.७९ | ४७५.८६ | |

## विवरणपत्र-२

### शासन निर्णय क्रमांक पुनर्वि-२०१७/प्र.क्र ३७/२०१७/१७स/दि.३१.३.२०१७

### मागणी क्रमांक व्ही-२,प्रधान लेखाशिर्ष : ३४५१- सचिवालयीन आर्थिक सेवा, पुनर्विनियोजन प्रस्ताव सन २०१६-१७ (अधिक)(+) विवरणपत्र योजनेतर योजना

(रु.लाखा

| अ. क्र | योजनेचे नाव | मुख्य लेखाशिर्ष /उप लेखाशिर्ष | सन २०१६-१७ चे अर्थसंकल्पिय अंदाज किंवा पुरक विनियोजन | | पुनर्विनियोजनाची रक्कम (+) | पुनर्विनियोजना नंतरची होणारी रक्कम | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | | ५ | ६ | ७ |
| १ | सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग | ०९०- सचिवालयीन, ००३-सचिवालयीन आर्थिक सेवा, (०१)सचिवालयीन आर्थिक सेवा, (०१)(०१)सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग (३४५१ ०३०४)-१३- कार्यालयीन खर्च | मं.त. | ३६.०० | ४६.७९ | ८२.७९ | मे.पॅरामिन ॲडव्हरटायझिंग अॅन्ड मार्केटिंग असोसिएट मुंबई यांना सावकारी अधिनि २०१४ ला प्रसिध्दी देण्याकरिता बनविलेल्या चित्रफितीचा व प्रसारणाचा खर्च अदा करण्यासाठी रु.४६,७९,२९२/- ची आवश्यक तरतूद. |
| | | एकूण | | ३६.०० | ४६.७९ | ८२.७९ | |